राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सार्वजनिक खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाच्या (PPP-IAD) प्रकल्पांतर्गत 'केळीच्या खोडावर प्रक्रिया करुन इतर उप-उत्पादने निर्मितीच्या पथदर्शी प्रकल्पास मंजूरीबाबत'

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि-२०१३/प्र.क्र.११२/राकृवियो कक्ष**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई -३२

दिनांक : २६ मार्च, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांक राकृवि २०१३/प्र.क्र.२५/राकृवियो कक्ष, दि. २१ फेब्रुवारी, २०१३

२) शासन निर्णय क्रमांक राकृवि २०१३/प्र.क्र.२५/राकृवियो कक्ष, दि. २६ फेब्रुवारी, २०१३

३) शासन पत्र क्रमांक राकृवि-२०१४/प्र.क्र.०५/राकृवियो कक्ष, दि. १८ मार्च, २०१४

४) शासन निर्णय क्रमांक राकृवि-२०१४/प्र.क्र.१५/राकृवियो कक्ष, दि. २८ एप्रिल, २०१४

५) शासन निर्णय क्रमांक राकृवि-२०१४/प्र.क्र.१५/राकृवियो कक्ष, दि. १७ जून, २०१४

**प्रस्तावना :**

सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूरीस्तव प्राप्त प्रकल्पांची छाननी करण्याकरीता दि. १० मार्च, २०१४ रोजी राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीची बैठक पार पडली होती. सदर बैठकीमध्ये तापी व्हॅली बनाना प्रोसेसिंग ॲन्ड प्रॉडक्टस् को-ऑपरेटीव्ह सोसायटी, लि. फैजपूर, ता.यावल जि. जळगांव या संस्थेने केळीच्या खोडावर (Biomass) प्रक्रीया करुन इतर उप-उत्पादने निर्मितीचा प्रकल्प मंजूरीस्तव सादर केला होता. छाननी समितीने सदर प्रकल्पास प्रचलित योजनांच्या अनुदानाच्या मानकांनुसार (Cost norms) अनुदान मंजूर करण्यात येईल असे अभिप्राय दिले होते तसेच त्यानुसार सुधारीत प्रकल्प सादर करण्याबाबत तसेच सदर प्रकल्प महात्मा फुले कृषि विद्यापीठासोबत संयुक्तपणे सादर करणेबाबत संदर्भांकित शासन पत्राद्वारे निदेशीत केले होते.

त्यानुषंगाने, संस्थेने प्रकल्प सुधारीत करुन राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सार्वजनिक खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाच्या (PPP-IAD) प्रकल्पांतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठासोबत संयुक्तपणे मंजूरीस्तव शासनास सादर केला आहे. या प्रकल्पामध्ये सद्यस्थितीत केळीच्या टाकाऊ असणाऱ्या खोड व पानांवर प्रक्रिया करुन मुल्यवर्धीत उत्पादनांच्या निर्मितीव्दारे शेतकऱ्यांना अतिरिक्त उत्पन्न मिळवून देण्याची क्षमता आहे. सबब, या प्रकल्पास **'पथदर्शी प्रकल्प'**

म्हणून मंजूरी देण्याबाबत शासनाच्या विचाराधीन होते, त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे -

**शासन निर्णय :**

१. सन २०१४-१५ मध्ये, तापी व्हॅली बनाना प्रोसेसिंग ॲन्ड प्रॉडक्टस् को-ऑपरेटीव्ह सोसायटी, लि. फैजपूर, ता.यावल जि. जळगांव या संस्थेने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत, सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाचे (PPP-IAD) प्रकल्पांतर्गत सादर केलेल्या 'केळी पिकाच्या खोडावर (Biomass) प्रक्रीया करुन इतर उप-उत्पादने निर्मिती' प्रकल्पास, या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ठामध्ये नमुद केलेल्या विवरणानुसार राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. संचालक (प्रक्रिया व नियोजन) तसेच संचालक (फलोत्पादन) यांनी सदर प्रकल्पांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने तात्काळ मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात. कृषि आयुक्तालयामध्ये 'फलोत्पादन पिकांकरीता' नियुक्त करण्यात आलेल्या नोडल / समन्वय अधिका-यांनी संबंधित संस्था व शासन यंत्रणेमध्ये समन्वय राखावा तसेच संचालक (फलोत्पादन) यांच्या मार्गदर्शनाखाली प्रकल्पाची राज्य स्तरावरुन अंमलबजावणी करावी.

३. सदर प्रकल्पांच्या राज्य स्तरावरुन संनियंत्रणाची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांचे अध्यक्षतेखालील राज्य स्तरीय समन्वय समितीवर राहील. त्याचप्रमाणे, राज्य स्तरीय समन्वय समितीमध्ये सर्व संबंधित समन्वय अधिका-यांचा समावेश करण्यात यावा आणि प्रकल्पांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सदर समिती आवश्यकतेनुसार इतर अधिका-यांचा देखिल समितीमध्ये समावेश करु शकेल. राज्य स्तरीय समन्वय समितीची कार्ये पुढीलप्रमाणे असतील -

   a. सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाच्या (PPP-IAD) मंजूर प्रकल्पांचे राज्य स्तरावरुन संनियंत्रण करणे.
   b. प्रकल्पांच्या प्रगतीचा मासिक आढावा घेणे.
   c. सदर प्रकल्पामध्ये सहभागी संस्था आणि इतर संबंधितासोबत ३ महिन्यातून किमान एकदा बैठक घेऊन प्रकल्पाच्या अंमलबजावणीमध्ये काही अडचणी निदर्शनास येत असतील तर त्याबाबत चर्चा करुन त्यावर उपाययोजना सुचविणे.

d. जिल्हा स्तरावरील विभागाची क्षेत्रिय यंत्रणा आणि प्रकल्पाशी संबंधित संस्थेचे जिल्हा स्तरावरील प्रतिनिधी यामध्ये समन्वय ठेवणे.
e. जिल्हा स्तरावर प्रकल्पांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी योग्य त्या सर्व उपाययोजना करणे.
f. प्रकल्पाचा मूल्यमापन अहवाल तयार करुन शासनास सादर करणे.

४. सदर प्रकल्प सन  १५-२०१४तसेच सन २०१५-१६ मध्ये प्रकल्प अहवालानुसार राबविण्यात यावा, सदर प्रकल्पांतर्गत संबंधित संस्था, शेतकरी आणि शासनाचा आर्थिक सहभाग याबाबतचा विस्तृत तपशील शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आलेला असून त्यानुसार प्रकल्पाची कटाक्षाने अंमलबजावणी करण्यात यावी.

५. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्य स्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या (SLSC) १७ व्या बैठकीमध्ये सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाच्या (PPP-IAD) प्रकल्पांना मान्यता प्रदान करण्याचे अधिकार राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्य स्तरीय प्रकल्प छाननी समितीस प्रदान केले आहेत (SLPSC). सबब, सदर प्रकल्पास आगामी राज्य स्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीत समितीची कार्योत्तर मान्यता घेण्याच्या तसेच सदर मान्यतेवेळी केंद्र शासन सदर प्रकल्पास ज्या अनुदान मानकांनुसार मान्यता प्रदान करेल ती वित्तीय मान्यता अंतिम राहील, या अटीस अधिन राहून सदर प्रकल्पास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

६. तापी व्हॅली बनाना प्रोसेसिंग ॲन्ड प्रॉडक्टस् को-ऑपरेटीव्ह सोसायटी, लि. आणि महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, अंतर्गत केळी संशोधन केंद्र, जळगांव यांनी सदर प्रकल्प संयुक्तपणे सादर केला आहे. सदर प्रकल्पांतर्गत 'केळी आधारीत शेती पध्दतीकरीता सेंद्रीय शेतीचे तंत्रज्ञान विकसित करणे तसेच प्रकल्पाच्या व्यवहार्यतेआधारे प्रकल्पाचे प्रमाणीकरण (Standardization) करुन' महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, यांनी शासनास शिफारशी सादर करावयाच्या आहेत.

७. सदर प्रकल्पास केवळ **'पथदर्शी प्रकल्प'** म्हणून मान्यता प्रदान करण्यात येत असून सदर प्रकल्पाचे प्रमाणीकरण करुन महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, यांच्यामार्फत रीतसर शिफारशी प्राप्त झाल्यानंतरच अशा प्रकारच्या प्रकल्पांना मंजूरी देण्याबाबत यथावकाश निर्णय घेण्यात येईल.

८. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीची जबाबदारी संचालक (फलोत्पादन) यांची असेल, त्यानुषंगाने त्यांनी प्रकल्पाकरीता मार्गदर्शक सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात, तसेच प्रकल्पास वेळोवेळी वितरित करण्यात येणा-या निधीचे व्यवस्थापन करावे आणि निधी विनियोगाबाबतचे उपयोगिता

प्रमाणपत्र तसेच प्रकल्पांचा मासिक भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल वेळोवेळी आयुक्त (कृषि) यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

९. संदर्भाधीन दि. २१ फेब्रुवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्प जिल्हास्तरावर राबविण्यासाठी प्रकल्पाशी संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा प्रकल्प समन्वय समिती स्थापन करावी. सदर समितीमध्ये या शासन निर्णयान्वये प्रकल्प संचालक (आत्मा), कृषि विकास अधिकारी, उप विभागीय कृषि अधिकारी, प्रकल्पाशी संबंधित तालुक्याचे तालुका कृषि अधिकारी आणि इतर संबंधित अधिका-यांचा समावेश करण्यात येत आहे. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी जिल्हयांतर्गत मंजूर असलेल्या प्रकल्पाशी संबंधित संस्थेच्या जिल्हास्तरावरील प्रतिनिधींशी आवश्यक समन्वय साधावा.

१०. या प्रकल्पांतर्गत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध करुन दयावयाचा निधी सन १५-२०१४ व सन २०१५-१६ मध्ये उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीतून प्रकल्पांच्या मागणीनुसार वेळोवेळी उपलब्ध करुन दयावा तसेच सदर निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार उपयोगात आणावा. आयुक्त (कृषि) यांनी या योजनेंतर्गत प्राप्त होणारा निधी व त्याच्या विनियोगाबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहित केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवावा, तसेच सदर निधीच्या विनियोगाबाबत संबंधित संचालकांकडून प्राप्त उपयोगिता प्रमाणपत्रांवर आधारीत उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२६१४४९३९३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and adf, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2015.03.26 15:00:33 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा .मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

४. अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग)/प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

५. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

६. सचिव (जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

७. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे .

९.संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

# परिशिष्ट

## राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सार्वजनिक खाजगी भागीदारी तत्वावर एकात्मिक कृषि विकासाच्या (PPP-IAD) प्रकल्पांतर्गत 'केळीच्या खोडावर प्रक्रिया करुन इतर उप-उत्पादने निर्मितीचा पथदर्शी प्रकल्प'

(Costs in ₹ Lakh)

| Sr. No. | Component | Unit | Quantity | Total Cost | Cost Sharing Pattern | | | Cost Norm |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | RKVY | Society | Farmer | |
| | **A. Cottage Industrial Unit at Village level** | | | | | | | |
| 1. | Land (10 R per Unit) | R | 200 | 40.00 | 00.00 | 00.00 | 40.00 | |
| 2. | Building & Shed | | | 60.00 | 30.00 | 15.00 | 15.00 | National Mission on Food Processing (Primary Processing & Collection centers in rural areas) @ 50% |
| 3. | Pseudo-stem splitting machine | No | 40 | 8.00 | 4.00 | 2.00 | 2.00 | |
| 4. | Raspador machine | No | 200 | 120.00 | 60.00 | 30.00 | 30.00 | |
| 5. | Storage Facilities<br>a. 500 lit. Plastic Tanks<br>b. Crates for scutcher<br>c. GI Tray under Raspador | No | 100<br>1500<br>400 | 5.00<br>3.75<br>1.20 | 2.50<br>1.875<br>0.60 | 1.25<br>0.94<br>0.30 | 1.25<br>0.94<br>0.30 | |
| 6. | Fiber Drying Scaffolding | | 20 | 1 | 0.5 | 0.25 | 0.25 | |
| 7. | Electric Connection Charges | Unit | 20 | 20.00 | 10.00 | 5.00 | 5.00 | |
| 8. | Electrification | Unit | 20 | 7.00 | 3.50 | 1.75 | 1.75 | |
| 9. | Transportation to Central Processing Unit for value addition | Days | 300 | 42.00 | 21.00 | 10.50 | 10.50 | |
| 10. | Scutcher waste Digester pits size10 X 12 X 4<br>Unit of 3 pits | No | 20 | 20.00 | 10.00 | 5.00 | 5.00 | Soil Health Mission @ 50% |
| | **TOTAL (A)** | | | **327.95** | **143.975** | **71.99** | **111.99** | |
| | **B. TRAINING & AWARENESS** | | | | | | | |
| 11. | Establishment of Training cum Demonstration Unit | | | | | | | |
| | a. Building 33348 Sq. ft | Sq. ft | 37.32 | 37.32 | 9.33 | 27.99 | 0.00 | RKVY @ 25% |
| | b. Shed 2000 Sq. ft | Sq. ft | 2000 | 3.00 | 0.75 | 2.25 | 0.00 | |
| | c. Tube well, Water Storage Tanks, Electric Connection & electrification | | | 2.53 | 0.63 | 1.90 | 0.00 | |
| | d. Pseudo-stem splitting machine | No | 2 | 0.40 | 0.10 | 0.30 | 0.00 | |
| | e. Raspador machine (Fiber extraction machine) | No | 5 | 3.00 | 0.75 | 2.25 | 0.00 | |
| | f. Office Furniture & equipment | | | 5.00 | 1.25 | 3.75 | 0.00 | |
| | g. Crates, | | | 2.50 | 1.25 | 1.25 | 0.00 | RKVY @ 50% |

| Sr. No. | Component | Unit | Quantity | Total Cost | Cost Sharing Pattern | | | Cost Norm |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | RKVY | Society | Farmer | |
| 12. | 2 day Training to farmers | No | 400 | 4.00 | 4.00 | 0.00 | 0.00 | ATMA @ 100% |
| 13. | 5 day Training of workers | No | 1260 | 18.90 | 18.90 | 0.00 | 0.00 | |
| 14. | Farmers exposure visit to Navasari Agri. University | No | 100 | 2.00 | 2.00 | 0.00 | 0.00 | |
| 15. | 1 week Training of skilled workers at Navasari Agri. University | No | 133 | 3.325 | 3.325 | 0.00 | 0.00 | |
| 16. | Literature and Booklet | No | 10000 | 2.50 | 2.50 | 0.00 | 0.00 | |
| | **TOTAL (B)** | | | **84.475** | **44.785** | **39.69** | **0.00** | |
| | **C. CENTRAL PROCESSING FACILITY UNIT** | | | | | | | |
| 17. | Land 3.5 acre | Acre | 146 | 146.00 | 0.00 | 146.00 | 0.00 | |
| 18. | Organic Liquid Fertilizer From Sap Unit | Unit | 1 | 40.00 | 20.00 | 20.00 | 0.00 | SHM @ 50% |
| 19. | Organic Manure from Scutcher Waste Unit | Unit | 1 | 14.00 | 7.00 | 7.00 | 0.00 | |
| 20. | Paper Manufacturing Unit | Unit | 1 | 56.62 | 14.16 | 42.46 | 0.00 | RKVY @ 25% |
| 21. | Technical Fee to Navasari Agriculture University | | | 5.00 | 1.25 | 3.75 | 0.00 | |
| 22. | Marketing & Branding of the products | | | 5.00 | 1.25 | 3.75 | 0.00 | |
| | **TOTAL (C)** | | | **266.62** | **43.66** | **222.96** | **0.00** | |
| | **D. Development of Organic Package of Practices for Banana Based Farming System & Standardization of the Project based on Feasibility Study by MPKV, Rahuri** | | | | | | | |
| 23. | Travelling allowances & Hiring of vehicles | | | 7.00 | 7.00 | 0.00 | 0.00 | RKVY @ 100% (Component is to be executed by SAU i.e. by MPKV, Rahuri. |
| 24. | Stationary etc. | | | 1.00 | 1.00 | 0.00 | 0.00 | |
| 25. | Testing fees to be paid to other agencies | | | 5.00 | 5.00 | 0.00 | 0.00 | |
| 26. | Miscellaneous expenditure | | | 1.00 | 1.00 | 0.00 | 0.00 | |
| 27. | Laptop with accessories (01) | | | 1.00 | 1.00 | 0.00 | 0.00 | |
| **TOTAL (D)** | | | | **15.00** | **15.00** | **0.00** | **0.00** | |
| **TOTAL (A+B+C+D)** | | | | **694.05** | **247.42** | **334.64** | **111.99** | |
| **% Composition of fund** | | | | **100** | **35.65** | **48.21** | **16.14** | |

*********